सन २०२२-२३ मधील रब्बी हंगामामध्ये जिल्हा व तालुका स्तरावरील पीकस्पर्धा विजेत्या शेतक-यांना बक्षीसांची रक्कम अदा करण्यासाठी उर्वरित रु.१७.१८२४० लक्ष निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध व्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक-पीकस्पर्धा-२०२३/प्र.क्र.१४२/४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-३२

दिनांक- ०७ मार्च, २०२४

**संदर्भ:-**

१) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.पिकस्पर्धा-२०२०/प्र.क्र.४८/४अे, दि.०५/१०/२०२०

२) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.पिकस्पर्धा-२०२०/प्र.क्र.४८/४अे, दि.०४/०८/२०२३

३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र./वि.प्र.४/पीकस्पर्धा/खरीप-२२/निधीमागणी/२०२३, दि.१४/०९/२०२३

४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र./वि.प्र.४/पीकस्पर्धा/रब्बी-२२/निधीमागणी/३१२६९/२०२३, दि.२७/०९/२०२३

५) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.पीकस्पर्धा-२०२३/प्र.क्र.१४२/४अे, दि.३०/०९/२०२३

६) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृमावि/वि.प्र.४/पीकस्पर्धा/१२९/२०२३, दि.०६/१२/२०२३

**प्रस्तावना:**

राज्यामध्ये पिकांची उत्पादकता वाढविण्यासाठी शेतक-यांकडून विविध प्रयोग करण्यात येतात व उत्पादकतेत वाढ करण्याच्या प्रयत्न केला जातो. अशा प्रयोगशील शेतक-यांना, प्रोत्साहन देऊन गौरव केल्यास त्यांची इच्छाशक्ती, मनोबल यांच्यामध्ये वाढ होऊन त्यांच्याकडून आणखी उमेदीने नवनवीन अद्ययावत तंत्रज्ञानाचा वापर केला जातो. कृषि उत्पादनामध्ये भर घालण्यासाठी शेतक-यांचे योगदान मिळते. तसेच त्यांचे मार्गदर्शन परिसरातील इतर शेतक-यांना होवून राज्याच्या एकूण कृषि उत्पादनात मोलाची भर पडते, हा उद्देश ठेऊन राज्यांतर्गत पीकस्पर्धांचे आयोजन करण्यात येते.

त्याअनुषंगाने सन २०२२-२३ मधील खरीप व रब्बी हंगामामध्ये राज्य ते तालुका स्तरावरील पीकस्पर्धा विजेत्या शेतक-यांना बक्षीसांची रक्कम अदा करण्यासाठी रु.१२७.११२४ लाख निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती कृषि आयुक्तालयाने उपरोक्त पत्रांन्वये केली होती. त्यानुसार या विभागाच्या संदर्भ क्र.५ येथील दि.३०/०९/२०२३ च्या शासन निर्णयान्वये रु.१०९.९३ लाख निधी आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन दिला असून, उर्वरित रु.१७.१८२४० लाख निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:**

१. रब्बी हंगाम २०२२-२३ मधील विविध पातळीवरील पीकस्पर्धा विजेते शेतक-यांना बक्षीसांची रक्कम वितरीत करण्यासाठी रु.१७.१८२४० लाख (रुपये सतरा लाख अठरा हजार दोनशे चाळीस फक्त) निधीच्या वितरणास मान्यता देण्यात येत आहे.

२. परिच्छेद क्र.१ मध्ये नमूद केल्यानुसार रब्बी हंगाम २०२२-२३ मधील विविध पातळीवरील पीकस्पर्धा विजेते शेतक-यांना बक्षीस रक्कम वितरीत करण्याकरिता सदर निधी पुढील लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्पीय तरतुदीतून खर्ची टाकावा:-

मागणी क्र.डी-३
(०१) (०३) पीक स्पर्धा (कार्यक्रम)
(२४०१ ०७५३)
५०-इतर खर्च

३. या शासन निर्णयान्वये वितरीत रु.१७.१८२४० लाख निधीचे कोषागारातून आहरण व वितरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण आधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | विभाग स्तर | विभागीय कृषि सहसंचालक | लेखाधिकारी, विभागीय कृषि सहसंचालक |
| ३ | जिल्हास्तर | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | लेखाधिकारी, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी |
| ४ | तालुका स्तर | तालुका कृषि अधिकारी | तालुका कृषि अधिकारी |

४. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०७१५५६४३३४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.03.07 16:06:06 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा
३. सर्व मा.विधान परिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५. मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
६. मा. मंत्री, (कृषि) यांचे खाजगी सचिव
७. अपर मुख्य सचिव,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१०. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
११. उप सचिव (४-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. कृषि संचालक, (सर्व) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. विभागीय कृषि सहसंचालक, सर्व
१४. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, सर्व
१५. तालुका कृषि अधिकारी, सर्व
१६. निवड नस्ती-४अे